राज्यातील ग्रामपंचायती व नगरपालिका
यांच्याकडून आकारण्यात येणाऱ्या करामधून
शासकीय विद्युत कंपन्यांना वगळण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१८/प्र.क्र.११७/ऊर्जा-५

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० डिसेंबर, २०१८.

**प्रस्तावना :**

महानिर्मिती, महापारेषण व महावितरण या शासकीय कंपन्यांकडून अनुक्रमे वीज निर्मिती, वीज पारेषण व वीज वितरणाचे कार्य करण्यात येते. याकरिता या कंपन्यांमार्फत राज्यात आवश्यक ठिकाणी विद्युत पायाभूत सुविधांची उभारणी करण्यात येते. या विद्युत पायाभूत सुविधांवर संबंधित ग्रामपंचायत, नगर पालिका व महानगरपालिका यांच्याकडून विविध कर आकारण्यात येतात. या करांचा बोजा सदर वीज कंपन्यांच्या एकूण वार्षिक महसूलाच्या गरजेमध्ये (ARR) समाविष्ट होत असल्याने पर्यायाने त्याचा समावेश वीज दरात होतो व परिणामी वीज दरामध्ये वाढ होते. सदर शासकीय कंपन्यांकडून राज्यातील जनतेस अखंडीत व सुरळीत वीज पुरवठा करणे व राज्यातील शेवटच्या घटकापर्यंत वीज पोहोचविणे ही महत्वाची कार्ये करण्यात येत असल्याने सदर कंपन्यांकडून ग्रामपंचायत, नगरपालिका व महानगरपालिका यांच्या हद्दीत उभारण्यात येणाऱ्या उपरी वाहिन्या, भूमिगत वाहिन्या, वितरण रोहित्रे, विद्युत खांब, विद्युत मनोरे व पारेषण वाहिन्या यावर कोणत्याही कराची आकारणी करण्यात येऊ नये यासाठी संबंधित ग्रामपंचायत, नगर पालिका किंवा महानगरपालिकांचे संबंधित अधिनियम, नियम व आदेश यामध्ये आवश्यक ती सुधारणा करुन शासकीय विद्युत कंपन्यांना कर आकारणी करण्यापासून वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याकरिता दिनांक २९ नोव्हेंबर, २०१८ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत याबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्यावर मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

ऊर्जा विभागांतर्गत शासकीय विद्युत कंपन्यांना तसेच त्यांच्या फ्रॅन्चाईझींना, त्यांच्याकडून उभारण्यात येणाऱ्या विद्युत वितरण पायाभूत सुविधांसाठी (उपरी वाहिनी, भूमिगत वाहिनी, वितरण रोहित्र, विद्युत खांब, विद्युत मनोरे, पारेषण वाहिन्या इ.) ग्रामपंचायत, नगरपालिका व महानगरपालिका यांच्याकडून कोणत्याही प्रकारची कर आकारणी करण्यात येऊ नये यासाठी संबंधित अधिनियम, नियम व आदेश यामध्ये संबंधित विभागाकडून योग्य ती सुधारणा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील निर्णयाच्या अनुषंगाने ग्रामविकास विभागाने व नगरविकास विभागाने आवश्यक ती पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १८५ / १८ / व्यय-१६ दि . १५.१०.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१२२११५०७३८०६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2018.12.21 15:11:08 +05'30'

**(भि.य.मंता)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत:**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नगर विकास-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव (विधी व न्याय), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व मंत्रालयीन विभाग
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी, प्रकाशगंगा, बीकेसी, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१८. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२१. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. अवर सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.